स्वच्छ महाराष्ट्र अभियान (नागरी) घनकचरा व्यवस्थापन प्रकल्पासाठी नागपूर महानगरपालिकेस केंद्र व राज्य शासनाच्या हिस्स्याचा निधी वितरीत करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: स्वमअ-२०१९/प्र.क्र.१२०(२)/नवि-३४**
हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक: २८ जानेवारी, २०२०

वाचा:

१) शासन निर्णय, नगर विकास विभाग, क्रमांक: स्वभाअ-२०१५/प्र.क्र.२३/नवि-३४,दि. १५.०५.२०१५.
२) शासन निर्णय, नगर विकास विभाग, क्रमांक. धोरण-२०१७/ प्र.क्र.९६/ नवि-१६, दि. १२.१२.२०१७.
३) वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्रमांक अर्थसं-२०१९/प्र.क्र.४४/अर्थ-३, दिनाक ०१.४.२०१९.
४) वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्रमांक अर्थसं-२०१९/प्र.क्र.९२/अर्थ-३, दिनाक ०८.७.२०१९.
५) केंद्र शासनाच्या गृह निर्माण व नागरीकार्य मंत्रालयाचे आदेश क्रमांक F.No. १/७/२०१५-SBM-I (e-file#३१०४७०६) दिनांक ३० सप्टेंबर, २०१९

**शासन निर्णय:**

देशातील सर्व शहरे पूर्णपणे स्वच्छ, निरोगी आणि राहण्यायोग्य करणे आणि सर्व नागरिकांना स्वच्छ व चांगले आरोग्य आणि पर्यावरण मिळावे तसेच देशातील सर्व सांविधानिक शहरांना स्वच्छतेची आणि या शहरामधील नागरीकांना घरगुती शौचालयांची सुविधा उपलब्ध करून देणे, या उद्देशाने केंद्र शासनाने “स्वच्छ भारत अभियान (नागरी)” ची अंमलबजावणी सुरु केली आहे. या अभियानाच्या धर्तीवर राज्यामध्ये संदर्भाधीन क्रमांक १ येथील शासन निर्णयान्वये “स्वच्छ महाराष्ट्र अभियान (नागरी)” राबविण्यात येत आहे.

२. स्वच्छ भारत अभियानांतर्गत नागपूर शहराच्या घनकचरा व्यवस्थापनाच्या मंजूर करण्यात आलेल्या सविस्तर प्रकल्प अहवालाकरीता केंद्र शासनाच्या हिश्याचा दुसरा हप्ता रूपये २८,८६,००,०००/- (रुपये अठ्ठावीस कोटी श्याऐंशी लक्ष फक्त) इतका निधी राज्यास प्राप्त झाला असून त्या प्रमाणात राज्य शासनाच्या हिश्श्याचा निधी रूपये १९,२४,००,०००/- (रुपये एकोणीस कोटी चोवीस लक्ष फक्त) असा एकूण रूपये ४८,१०,००,०००/- (रुपये अठ्ठेचाळीस कोटी दहा लक्ष फक्त) इतका निधी वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

३. सदरचा खर्च पुढील तक्त्यात नमूद केल्यानुसार संबंधित लेखाशिर्षासमोर दर्शविलेल्याप्रमाणे संबंधित लेखाशिर्षाखाली सन २०१९-२० या आर्थिक वर्षात मंजूर करण्यात आलेल्या तरतूदीमधून भागविण्यात यावा.

| अ.क्र. | लेखाशिर्ष | अर्थसंकल्पीत करण्यात आलेली निधी रूपये |
|---|---|---|
| | **महानगरपालिका** | |
| १ | मागणी क्रमांक-एफ-२, २२१७, नगरविकास, (८०) सर्वसाधारण, १९१, महानगरपालिकांना सहाय्य, (००) (७६) स्वच्छ भारत अभियानासाठी महानगरपालिकांना सहाय्य (केंद्र हिस्सा), ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर), (२२१७ ९७५२) योजनांतर्गत | २८,८६,००,०००/- (रुपये अठ्ठावीस कोटी श्याऐंशी लक्ष फक्त) |
| २ | मागणी क्रमांक-एफ-२, २२१७, नगरविकास, (८०) सर्वसाधारण, १९१, महानगरपालिकांना सहाय्य, (००) (७७) स्वच्छ भारत अभियानांतर्गत महानगरपालिकांना सहाय्य (राज्य हिस्सा), ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर), (२२१७ ९७६१) योजनांतर्गत | १९,२४,००,०००/- (रुपये एकोणीस कोटी चोवीस लक्ष फक्त) |

४. सदर निधी आहरित करण्यासाठी राज्य अभियान संचालक, स्वच्छ महाराष्ट्र अभियान (नागरी) यांना आहरण व संवितरण अधिकारी तसेच नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. त्यांनी सदर रकमेचे देयक तयार करून ते अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई यांच्याकडे तात्काळ सादर करून सदर निधी आहरित करून धनादेश प्राप्त करून घेण्यात यावा व सदर निधी नागपूर महानगरपालिकेस वितरीत करण्याबाबतची कार्यवाही करावी.

५. सदरचा शासन निर्णय वित्त विभागाचे परिपत्रक क्र. अर्थसं-२०१९/प्र.क्र.४४/अर्थ-३, दि. १.४.२०१९ व क्र. अर्थसं-२०१९/प्र.क्र.९२/अर्थ-३, दि. ०८.७.२०१९ अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे.

६. वित्त विभागाचे परिपत्रक क्र. अर्थसं-२०१९/प्र.क्र.४४/अर्थ-३, दि. १.४.२०१९ व क्र. अर्थसं-२०१९/ प्र.क्र.९२/ अर्थ-३, दि. ०८.७.२०१९ मधील परिच्छेद क्र. ४ ते १९ मधील अनुक्रमांक ४, ५, ६, ८, १०, ११, १२, १४, १५, १६, १८, १९ अटी लागू नाहीत व उर्वरित ७, ९, १३ व १७ या अटींची पुर्तता करण्यात आली असल्याचे प्रमाणीत करण्यात येत आहे.

७. वित्त विभागाचे परिपत्रक क्र. अर्थसं-२०१९/प्र.क्र.९२/अर्थ-३, दि. ०८.७.२०१९ रोजीच्या शासन परिपत्रका सोबत जोडलेल्या परिशिष्टामधील अनुक्रमांक ९ मधील तपासणी सूचिमधील १ ते ५ व ७ आणि ९ या अटींची पुर्तता करण्यात आली असल्याचे प्रमाणीत करण्यात येत आहे, तसेच उर्वरित अटी लागू नाहीत.

८. वित्त विभागाच्या शासन परिपत्रक वित्त विभाग क्र. अर्थसं-२०१९/प्र.क्र.४४/ अर्थ-३, दिनांक १ एप्रिल, २०१९ व क्र. अर्थसं-२०१९/प्र.क्र.९२/अर्थ-३, दि. ०८.७.२०१९ नुसार केंद्र पुरस्कृत योजनेसंदर्भात केंद्र शासनाकडून निधी प्राप्त झाल्याची खात्री वित्त विभागाच्या अर्थोपाय शाखेकडून करून घेण्यात आली आहे. **केंद्र व राज्य शासनाचा हिस्सा मिळून एकूण रूपये ४८,१०,००,०००/- (रुपये अठ्ठेचाळी कोटी दहा लक्ष फक्त)** इतका निधी मंजूर करण्यात येत आहे.

९. वित्त विभागाचे शासन परिपत्रक अर्थसं-२०१९/प्र.क्र.४४/ अर्थ-३, दिनांक १ एप्रिल, २०१९ व क्रमांक अर्थसं-२०१९/प्र.क्र.९२/अर्थ-३, दिनाक ०८ जुलै, २०१९ नुसार विभागास प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय अधिकारानुसार व वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. अनौ-३६६/अर्थोपाय, दिनांक ११/१०/२०१९ अन्वये प्राप्त झालेल्या अधिकारानुसार सदर शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

१०. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२००१२८१६४६४३५१२५ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Ajit Sahebrao Palwe

Digitally signed by Ajit Sahebrao Palwe
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Urban Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=bcc5dbdaa52955626b8257f1105a8a62ddbd1337948a428b4e4c992e5d3bf423, cn=Ajit Sahebrao Palwe
Date: 2020.01.29 11:56:07 +05'30'

**(अजित पालवे)**

**कार्यासन अधिकारी**

**प्रत,**

१) मा. मुख्यमंत्री महोदयांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.

२) मा. मंत्री (नगर विकास) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.

३) मा. राज्यमंत्री (नगर विकास) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.

४) अपर मुख्य सचिव, वित्त, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
५) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता )-१, मुंबई.
६) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता )-२, नागपूर.
७) प्रधान सचिव (नवि-२), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई ३२.
८) आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद संचालनालय, मुंबई.
९) आयुक्त, नागपूर महानगरपालिका.
१०) राज्य अभियान संचालक, स्वच्छ महाराष्ट्र अभियान (नागरी), मुंबई.
११) संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई.
१२) अधिदान व लेखाधिकारी, फोर्ट, मुंबई.
१३) अधिदान व लेखाधिकारी, अधिदान व लेखा कार्यालय, वांद्रे, मुंबई.
१४) निवासी लेखापरिक्षा अधिकारी, मुंबई.
१५) मुख्य लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
१६) मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई.
१७) कक्ष अधिकारी (नवि-१६), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१८) निवडनस्ती, नवि-३४